**वार्षिक योजना सन २०२५-२६**
**राज्यस्तरीय योजनेअंतर्गत फिरत्या पथकाचे सक्षमीकरण (२४०६ २१६१) या योजने अंतर्गत मुख्य वनसंरक्षक (भूमि अभिलेख) नागपूर विभागांतर्गत निर्लेखित केलेले ०१ वाहनाच्या बदली त्याच प्रकारातील नविन ०१ वाहन खरेदी करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: वाहन-२०२४/प्र.क्र.२६२/फ-५**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: ०३ जून, २०२५

**संदर्भ :** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : वाहन २०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम दि.२२ ऑगस्ट, २०१४

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२ दि.१७ एप्रिल, २०१५

३) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१५ व क्र. संकीर्ण-२०१६ /प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१७.०३.२०२२

५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:वाहन-२०२३/प्र.क्र.०५/फ-५ दि. २६ डिसेंबर, २०२३

६) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : वाहन २०२४/प्र.क्र.११/विनियम दि.०२ फेब्रुवारी, २०२४

७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-८/वाहन/प्र.क्र.१ भाग-६/(२०२४-२५)/१४७८, दि.०५.०२.२०२५

८) वनसंरक्षक (प्रादेशिक) नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१२/योजना/ प्र.क्र.१५/ ३३५४ दि.३१.०१.२०२५

**प्रस्तावना :**

वन विभागाच्या अधिनस्त विविध कार्यालयासाठी संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये १४४२ वाहनांचा (कार-१३३, जीप-९२२ व इतर विविध प्रकारची ३८७ वाहने) आढावा मंजूर करण्यात आला आहे.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे अधिपत्याखालील राज्य योजनेअंतर्गत फिरत्या पथकाचे सक्षमिकरण योजनेअंतर्गत वाहन आढावा समितीने मान्यता दिलेल्या वाहनापैकी, मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख) नागपूर विभागात निर्लेखित

केलेले ०१ (कार) वाहनाच्या बदल्यात त्याच प्रकारातील नवीन ०१ वाहन (०१-कार) खरेदी करण्यासाठी सादर केलेल्या प्रस्तावास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

वन विभागातील वनसंरक्षण व इतर महत्वाची कामे करण्यासाठी जीप, कार, व इतर प्रकारातील विविध वाहने वापरात आहेत. शासनाने ठरवून दिलेल्या मापदंडानुसार वाहने विहित कालमर्यादेनंतर निर्लेखित करण्यात आलेल्या वाहनांच्या बदल्यात त्याच प्रकारातील नवीन वाहने घेण्यात येतात. त्यानुषंगाने संदर्भ ७ व ८ नुसार मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख) नागपूर विभागांतर्गत निर्लेखित केलेले ०१ वाहनाच्या बदल्यात त्याच प्रकारातील नवीन ०१ वाहन (०१-कार) खरेदी करण्यास खालील अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

१) निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली यापूर्वी नवीन वाहने खरेदी करण्यात आलेली नाहीत या अटीच्या अधिन राहून, नवीन वाहने खरेदी करण्यात यावीत.
२) संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयामधील तरतुदीच्या अनुषंगाने निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली नवीन वाहने (वाहनाची किमंत + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभूत साहित्य इत्यादी अंतर्भूत करुन) निश्चित करण्यात आलेल्या वाहन किंमत मर्यादेतच खरेदी करण्यात यावीत.
३) वाहने खरेदी करतांना उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१५ व क्र. संकीर्ण-२०१६/ प्र.क्र.२१५ /उद्योग-४, दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.
४) वाहने खरेदी करतांना त्या संबधीच्या नेहमीच्या कार्यपध्दती विषयी नियमांचे आणि इतर सर्व निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी तसेच यामध्ये कोणत्याही प्रकारची अनियमितता आढळल्यास त्याची जबाबदारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर या कार्यालयाची राहील.
५) वाहन अनुज्ञेय असणाऱ्या अधिकाऱ्यांच्या वापरातील ज्या प्रकारचे वाहन निर्लेखित करण्यात आले आहे, त्या वाहनाऐवजी संबधित पदासाठी त्याच प्रकारचे वाहन अनुज्ञेय राहील.
६) नवीन वाहन खरेदीनंतर त्यांची नोंद महावाहन संगणक प्रणालीवर नोंदविण्यात यावी.
७) वाहन अनुज्ञेय असणाऱ्या एका अधिकाऱ्याच्या वापरात फक्त एकच वाहन असावे.
८) कोणत्याही परिस्थितीत वाहन चालकांची नवीन पदे निर्माण करण्यात येऊ नयेत.
९) निर्लेखित केलेले वाहन क्रमांक **MH-31-AG-9580** (कार) या वाहनांच्या बदल्यात त्याच प्रकारातील नवीन ०१ वाहन खरेदी करण्यात यावे.
१०) वित्त विभाग शासन निर्णय दि.१७.४.२०१५ अन्वये प्रसिध्द झालेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ मधील भाग पहिला उप विभाग-दोन मधील अ.क्र.१९क, नियम-६९ ही वित्तीय शक्ती नमूद करुन निर्लेखनाचे सुधारीत आदेश निर्गमित करण्याच्या अधिन राहून, वाहन खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वाहन खरेदीसाठी लागणाऱ्या निधीबाबत वेगळयाने कळविण्यात येईल.

३. सदर शासन आदेश, वित्त विभागाचा अनौपचारिक सं.क्र.१७१/२०२५/विनियम दि.२८.०४.२०२५ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२१९/व्यय-१०/ दि.१५.०५.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३ /प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र.३, परिच्छेद १६६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharqashtra.gov.in या सकेंतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०३१३४२३५४९१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7e3227e15fe5debe28837d6e68d17c1f6e96d1a6dc7f27bc7e0f3ec07bbdfab8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B1AFE499C80878329FBB017E4922F7356CC5EDC76102E8FF88C7B9A67A322D9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2025.06.03 13:43:36 +05'30'

**(विवेक होशिंग)**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) अपर मुख्य सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) महालेखापाल १/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख) नागपूर
९) वनसंरक्षक (प्रादेशिक) नागपूर.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी ( नागपूर )
११) कार्यासन, व्यय-१०/विनियम, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२) कार्यासन फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४) कार्यासन फ-५ निवड नस्ती, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२